**ॲड. श्री. वैभव बगाडे यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत....**
**डी.सी.बी.,सी.आय.डी., गु.र.क्र. १५२/०४ (विक्रोळी दारुकांड प्रकरण) यातून उद्भवलेल्या मा. विशेष सत्र न्यायालय, मुंबई येथे दाखल न्यायालयीन प्रकरणामधील कामकाजासाठी.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एसपीपी ०१२०/प्र. क्र.२०/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
२ रा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- ०८ सप्टेंबर, २०२१

**संदर्भ:-** (१) विधी व न्याय विभाग, शासन अधिसूचना क्र. एसपीआर-२१०५/ए.एस.५९/१४, दि. ६/६/२००५.
(२) सह पोलीस आयुक्त (गुन्हे), मुंबई यांचे पत्र जा.क्र.६९५/सहपोआ/गुन्हे/२०१९, दि. १८/१२/२०१९.
(३) वरिष्ठ पो.नि., गु.प्र.शा., गु.अ.वि., कक्ष-७, यांचे पत्र जा.क्र. १७९८/२०२०, दि. १९/१२/२०२०.

**प्रस्तावना:-**

डी.सी.बी.,सी.आय.डी., गु.र.क्र.१५२/०४ (विक्रोळी दारुकांड) या गुन्हयातून उद्भवलेले मा. विशेष सत्र न्यायालय न्याय प्रकरण क्र. ३९५/२००५ हे न्यायालयीन प्रकरण पहाण्यासाठी ॲड. श्री. वैभव बगाडे यांची विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून उपरोक्त संदर्भ क्र. १ वरील विधी व न्याय विभागाच्या दिनांक ०६.०६.२००५ रोजीच्या शासन अधिसूचनेन्वये नियुक्ती करण्यात आली होती.

२. सह पोलीस आयुक्त (गुन्हे), मुंबई यांच्या उपरोक्त संदर्भ क्र.२ वरील पत्रान्वये मा. विशेष सत्र न्यायालय न्याय प्रकरण क्र. ३९५/२००५ हे न्यायालयीन प्रकरण पहाण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त ॲड. श्री. वैभव बगाडे यांना व्यावसायिक फी अदा करण्याबाबतचा शासन निर्णय अद्याप निर्गमित झाला नसल्याने सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्याची विनंती शासनास करण्यात आली.

३. वरिष्ठ पोलीस निरीक्षक, गु.प्र.शा., गु.अ.वि., कक्ष-७, यांच्या संदर्भ क्र. ३ वरील पत्रान्वये उक्त न्याय प्रकरणी सन २०१२ पासून शासन निर्णय निर्गमित न झाल्याने ॲड. श्री. वैभव बगाडे यांना अद्याप कोणतीही फी अदा करण्यात आलेली नसल्याबाबतचा अहवाल शासनास सादर केला.

**शासन निर्णय: -** डी.सी.बी.,सी.आय.डी., गु.र.क्र.१५२/०४ (विक्रोळी दारुकांड) या गुन्हयातून उद्भवलेले मा. विशेष सत्र न्यायालय न्याय प्रकरण क्र. ३९५/२००५ हे न्यायालयीन प्रकरण पहाण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त ॲड. श्री. वैभव बगाडे यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**मा. विशेष सत्र न्यायालय, मुंबई**
प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी ...रू. ३,५००/- (रुपये तीन हजार पाचशे फक्त)

तसेच सदर व्यावसायिक फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड. श्री. वैभव बगाडे यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता व्यावसायिक फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. न्यायालयीन कामकाजाचे परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकांकडून तपासून, प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान ॲड. श्री. वैभव बगाडे यांना होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलिस उपायुक्तांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) (१०८), राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) २८ व्यावसायिक सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत आदेश अनौ. सं. क्र. ४१४ /२०२१/व्यय-७, दिनांक २३/०६/२०२१ अन्वये प्राप्त शासन मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९०८१५३२५१०६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tushar Dilip Rathod

Digitally signed by Tushar Dilip Rathod
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e7e9706be693397ead11bd0e0b8fbaec45488529c8b57466dbf3e7c095089c08, pseudonym=E5959DAF1A16023D678D1801FC611F35E4BD65FF, serialNumber=B88BABB31CB2C1163B5A1E41E86D809272FEA914814734600D0B42642848C06F, cn=Tushar Dilip Rathod
Date: 2021.09.08 15:34:41 +05'30'

**(तुषार दि. राठोड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, बृन्हमुंबई.
३. सह पोलीस आयुक्त (गुन्हे), मुंबई
४. पोलीस उप आयुक्त, गु.प्र.शा., गु.अ.वि-कक्ष ७, गुन्हे शाखा, मुंबई.
५. वरिष्ठ पोलीस निरीक्षक, गु.प्र.शा., गु.अ.वि-कक्ष ७, गुन्हे शाखा, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ , मुंबई .
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. ॲड.श्री.वैभव बगाडे, बी/३०५, समाजदिप को-ऑप. सोसा.अडूकिया मार्ग,कांदिवली (प), मुंबई-६७.
१०. कक्ष अधिकारी, विधी व न्याय विभाग (कार्या-१४ ), मंत्रालय, मुंबई.
११.कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई
१२.निवड नस्ती (पोल-१०).